**जन**
**वाचन**
**आंदोलन**

नवसाक्षर माला

गावोगावी पुस्तके घेऊन जाणारे आंदोलन !
पुस्तक हे एक साधन आहे -



- वाचनसंस्कृती विस्तारण्याचे,
- निरंतर शिक्षणाचे,
- आपले गाव फुलविण्याचे,
- प्रत्येक माणूस स्वावलंबी बनण्याचे,
- प्रेम, सहकार्य, व मानवतेची विशाल संस्कृती फुलवण्याचे,
- लोकशाही बळकट करण्याचे,
- जग जाणून घेण्याचे व ते बदलण्याचे

ज्ञान-विज्ञान सर्वांसाठी, छोट्यांसाठी-मोठ्यांसाठी !
ज्ञान-विज्ञान सर्वांसाठी, स्त्रियांसाठी-पुरूषांसाठी



**भारत ज्ञान विज्ञान समुदाय**

मूल्य : बारा रुपये

---



भारत
ज्ञान विज्ञान
समुदाय

कवी : सफदर हाश्मी
रूपांतर : वंदना भागवत

# दुनिया सर्वांची

पुस्तकाचे नाव : दुनिया सर्वांची
कवी : सफदर हाश्मी / रूपांतर : वंदना भागवत
चित्रकार : बिंदिया थापर
जवाआं/३२ प्रकाशन : १ली आवृत्ती - जून १९९७, २री आवृत्ती - जानेवारी २००३,
३ री आवृत्ती - जानेवारी २००७

नववाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समितीतर्फे देशभर चालवल्या जात असलेल्या 'जनवाचन आंदोलन' मोहिमेसाठी प्रकाशित 'निरंतर शिक्षण कार्यक्रमातील ग्रंथालयासाठी पुस्तके सन २००३'

मूल्य : १२ रूपये


प्रकाशक/मुद्रक : विनया देशपांडे
जनवाचन समन्वयक, भारत ज्ञान विज्ञान समुदाय (महाराष्ट्र)
९, आधार अपार्टमेंट, ३०५, नारायण पेठ, पुणे - ४११०३० (फोन : ०२०-२४४३४१३३)
मुद्रण स्थळ : महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय, पुणे - ४११००४

अक्षर जुळणी : गणेश कांबळे / मुखपृष्ठ मांडणी : योगेश बंगाळे

# दुनिया सर्वांची

अकबर राजा प्रसिद्ध मोठा.
सगळे म्हणती खूपच शहाणा.
सर्वांना तो सांगत असे आपल्या
शहाणपणाचे किस्से.
'आम्ही पाह्यले आहे जग सारे.
पाह्यले आहेत चंद्र व तारे.
पर्वत, डोंगर, नद्या झरे.
मैदाने, सागर अन् किनारे.
गावे, गल्ल्या, खेडी, शहरे.
झोपड्या, वस्त्या आणि घरे.



पाह्यली प्रजा, राजे पाह्यले, कोणते कोणते वीर पाह्यले.
ढोल, झांजा, ताशे पाह्यले नाटक आणि तमाशे पाह्यले.
राजनीतीचे पेच पाह्यले साधू आणि भोंदू पाह्यले.
नजर जिथे वळली आमची, सत्ता असे आमची तेथे.
इंच इंच या भूमीचे आम्ही राजाधिराज असू येथे.



अकबराच्या दरबारी त्या
एक शहाणा बिरबल असे.
छोटासा व लहानखुरा पण
चातुर्य जगाचे त्याच्यापाशी असे.
हुषार मोठा, लगेच समजला
राजाचा आजार त्याला.



अहंकाराने अकबर राजा
कळले त्याला फुगून गेला.

असाच एकदा राजा जाई
किल्ल्यावर माराया चक्कर.
फिरता फिरता सावध तो होई,
पायाला बसता ठोकर.
पाहून साधूला एका,
निवांत पडलेला तिथे.



लाथ मारूनी उठवी त्याला,
राजा अकबर संतापाने

गरजला क्रोधाने, ''ऊठ थेरड्या कसा लोळतो इथे?
या मातीच्या कणाकणावर
माझाच हक्क असे.
गवताची काडीही इथली
माझ्या अधिकाराने हले.''



किलकिले आपले करून डोळे
साधू आपले कान खाजवे.
मान झटकूनी, नाकही मुरडे
आळस देऊन हात पसरे.
पायाची मोडूनी दाही बोटे
डोळे मिचकावून तो बोले.





''जय शिवशंकर जयबम भोले!
बिलकुल मला माहित नसे,
येथील काडीकाडीवर म्हणसी
तुझाच केवळ अधिकार असे?
जय शिवशंकर जय बम भोले! हा तुझा अहंकार असे!''

मिशा पिळत अकबर बोले,
''उचल तुझी कुबडी, झोळी, चालता हो इथून आधी.
झाडांची पाने, गवताची काडी मधमाशांची सगळी पोळी.
फत्तेपूरच्या सगळ्या भिंती, सर्व मनोरे सगळ्या घुमटी.
सगळी दारे प्रत्येक खिडकी, यावर सत्ता केवळ माझी.
नवे-जुने, ताजे-शिळे, सारे दगड, माती-खडे

सगळे माझे, सगळे माझे.''



कुरवाळीत दाढी अपुली,
आश्चर्यचकित नजरेनी पाहून.
घसा हलकेच खाकरूनी,साधू राजाला विचारी.
''असेल आपली परवानगी जर
विचारतो प्रश्न द्यावे उत्तर.
फत्तेपूरात रहात असता
किती वर्षे झाली आपल्याला?''
राजा बोले, ''इथे जन्मलो मी. इथून पाहिली पहाट पहिली.''
साधू विचारी, ''तुमच्या आधी, कोण असे इथला राजा?
सकाळी ज्याच्यासाठी घडे चौघडा आणि वाजे शहनाई?''





अकबर म्हणे, ''साधूबाबा इतके कसे अडाणी?
माझ्याआधी राज्य करती माझे पूज्य पिताजी.''
''त्यांच्याआधी कोणी इथे सत्ता गाजवली असे?''
''बाबर आजोबा, अरे मूर्खा
जग ज्यांना राजाधिराज म्हणे.''
''बाबा-पणजोबांच्या, सगळ्यांच्याही
आधी मालक कोण होते?
अन् असतील जर हेच मालक.
इथले महाल, बागबगीचे
सारे इथेच का राहिले?
जाताना त्यांनी ते बरोबर का नाही नेले?



सगळे असती फक्त प्रवासी.
काही काळ जगात येती.
चालून आपल्या वाटेवरती,
परत आपला रस्ता धरती.
आयुष्यातील रस्ते सगळे,
इथेच रहाती, इथेच संपती.''

अकबर म्हणे, ''खरे असे. राजा मी एकमेव नसे.
साधूबाबा खरे बोलला हा मोठाच धडा असे.''
साधू वदे मग हसून थोडा,
''किल्ला नव्हे हा तुझा राजा. ही तर केवळ धर्मशाळा.
तू असशी पथिक मुक्कामाला.



महाल कशाला,जगच सगळे केवळ एक धर्मशाळा असे.
दूर जवळच्या पांथस्थांना इथे जरा विसावा मिळे.

कशास गमजा मग कराव्या सर्व सर्वही माझे केवळ?
नाही एकही गोष्ट आपुली घर असो वा रस्ते निव्वळ.
नाही झाडे, झुडपे जाळी. वा मधमाशांची असोत पोळी.
नाही खिडक्या वा दरवाजे नाही फुले ताजी-शिळी.
नाही किल्ल्यांचे हे तट नाही मनोरे ना घुमट.
ना दुनिया ही तुझी न माझी.
ना कुणाची ही बांध खूणगाठ.''
अकबराला सुचेना उत्तर, मनात परंतु समजे.



बरोबर सर्वांचे असता हे जग, नाही एकदोघांचे खरोखर.
राजा विचारात पडलेला. साधू आपल्या गालात हसला.
डोळे मिचकावून म्हणाला, ''केली थोडी गंमत राजा,
साधू बैरागी मी नाही. ओळखले नच बिरबलाला.
पण ठेव मनाशी एक गोष्ट ही.
नष्ट करशील राज्य तुझे तू,
जर इतरांना विसरशील तू.''



अकबर उद्‌गारे ''बिरबल!
तू तर भलताच बिलंदर.
मी समजत होतो तुला
साधू बैरागी खरोखर!''



# झाड



या रे या - या ना - या जंगलात.
घाबरू नको!
मी या जंगलातलंच एक झाड,
तुम्हाला बोलावतोय.
तुम्हाला काही सांगायचंय. इथे या ना.

या माझ्या खोडाला हात लावून पहा.
सरळ, मजबूत, आणि उंच वरती.
माझ्या लवलवत्या फांद्या पहा
आणि अगणित डहाळ्या.
काय पानं कुठं गेली?



अरे बाबा,
ती तर शिशिराच्या
पानगळीतच गेली.
पण येतील ना,
लवकरच फुटतील पुन्हा.
माझ्या फांद्या लहडून
जातील. माझी मुळं,
दिसणार नाहीत तुम्हाला.
पण ती आहेत!
जमिनीच्या खालती खोलवर पसरलेली..
तीच तर शोषून घेतात



माझी तहान भागवण्यासाठी,
माझी पानं सजवण्यासाठी.
बघ, पानं फुटलीसुद्धा!
हिरवेगार माझे कपडे.
पण हे काही फक्त
कपडेच नाहीत माझे.
माझं पोषणदेखील करतात हे.
हवेतून ओढून घेतात श्वास
आणि सूर्यातून उष्णता.
माझं अन्न बनवण्यासाठी!
हे किडे - कीटक सरपटणारे,
उडणारे, खुदखुदणारे. हे सगळे माझे मित्र आहेत.



माझ्या ढलप्यांत, ढोल्यांत, भेगात, मी यांना संभाळलं आहे.
यांच्या अंड्यांना
हिवाळ्या, उन्हाळ्यापासून
वाचवलं आहे.
यांच्या बाळांना
माझ्या छातीवर झोपवलं आहे.
म्हणून तर खूष होऊन
हे गातात गाणी.
मधुर गीतं गुणगुण, झिनझिन.
आणि नाचतात दिवस दिवस अंगभर.
रंगीबेरंगी पक्षी येतात माझ्यापाशी.
होतात मित्र माझे, माझ्या डहाळ्यांमध्ये बांधतात घरटे आपले.







किलबिलतात, गातात, उडतात, भिरभिरतात.
आपल्या छोट्या छोट्या
पिलांना उडायला शिकवतात.
मला मुलं खूप आवडतात.
मी मुलांना आवडतो.
येतात माझ्या सावलीत मजा करायला.
माझ्या फांद्यांना लोंबकळायला, करून
झुला.
माझी आंबटगोड फळं लपून छपून
खायला.
माझ्याकडे बघा, या जंगलातल्या
सगळ्याच झाडांवर प्रेम करा.



तुमचं आमचं नातं
किती जवळचं आहे ठाऊक आहे?
हे जंगल तुम्हा सगळ्यांच्याच
किती उपयोगी पडतं माहित आहे?
माझ्या लाकडांपासूनच बनतात
तुमची टेबलं खुर्च्या.
तुमचे झोपायचे पलंग आणि दरवाजे खिडक्या!
तुमची पेन्सिलसुद्धा.
शिक्षकांना विचारा ते सांगतील तुम्हाला,
मी पाऊसदेखील पाडतो.
मातीची धूप थांबवतो.
पुराला रोखतो दुष्काळ हटवतो.





हे सगळं जंगल किती
उपयोगी पडतं तुमच्या!
किती सुख देतं तुम्हाला!
पण नफेखोर व्यापारी,
कापून टाकतात झाडे सरसकट.
बेलगाम नवीन झाडेही न लावता.
थांबवा - थांबवा,
त्या लोभी नफेखोराला थांबवा.
आवरा त्या जंगलकापूला
नाहीतर एखादे दिवशी
संपून जाईल जंगल सारे.
शिल्लक राहील स्मशान फक्त,
सांभाळत खोडांची कलेवरे.